रसायन तंत्रज्ञान संस्था, मुंबई या संस्थेच्या उपकेंद्रासाठी "३१-सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक: तंनिवि-१५२४/प्र.क्र.१७१/२४/तांशि-३,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२,
दिनांक:- २९ मार्च, २०२५.

**संदर्भ-:**

१) उच्च व तंत्रशिक्षण, शासन निर्णय क्र.१११९/(२०/१५)/एलबी/तांशि-२, दि.२३/०५/२०१८.
२)उच्च व तंत्रशिक्षण, शासन ज्ञापन क्रमांक: तंनिवि-१०२२/प्र.क्र.१०/२२/तांशि-३, दि.१९/९/२०२२
३)उच्च व तंत्रशिक्षण, शासन ज्ञापन क्रमांक: तंनिवि-१५२४/प्र.क्र.१७१/२४/तांशि-३, दि.१६/१०/२०२४
४)संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांचे पत्र क्र.DTEM-D९०PLAN/१९/२०२५-DESK९, दि.०४/०२/२०२५.
५)वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५/०७/२०२४.

**ज्ञापन:-** वार्षिक योजना २०२४-२५ मध्ये रसायन तंत्रज्ञान संस्था, मुंबई (शासकीय अभिमत दर्जा विद्यापीठ) या संस्थेचे या संस्थेचे मराठवाडा उपकेंद्र जालना येथील पायाभूत सुविधा व विविध इमारतींचे बांधकाम करीता रु.६९९.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्याबाबत संचालक, तंत्रशिक्षण यांनी संदर्भाधीन दि.०४/०२/२०२५ च्या पत्रान्वये प्रस्ताव सादर केला आहे. त्यास अनुसरुन वित्त विभागाच्या निदेशानुसार रु.३८९.६१ लक्ष (रुपये तीन कोटी एकोणनव्वद लक्ष एकसष्ट हजार फक्त) इतके सहायक अनुदान कोषागारातून आहरीत व वितरीत करण्यास याव्दारे मंजूरी देण्यात येत आहे.

२. सन २०२४-२५ मध्ये वितरित करावयाच्या निधीचा तपशील खालीलप्रमाणे आहे:-

(रुपये कोटीत)

| **राज्य हिस्सा** | **दि.३१ मार्च , २०२४ पर्यंत दिलेला निधी** | **वितरीत करावयाचा उर्वरित निधी** | **सुधारीत अंदाज** | **चालू वर्षी वितरीत केलेला निधी** | **अवितरित निधी** | **आता वितरीत करावयाचा निधी** |
|---|---|---|---|---|---|---|
| १००.०० | २८.२४३ | ७१.७५७ | ६.९९३० | ३.०९६९ | ३.८९६१ | ३.८९६१ |

३. वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२५ जुलै, २०२४ च्या परिपत्रकानुसार आवश्यक असलेल्या बाबींचा तपशील पुढीलप्रमाणे:-

| अ.क्र. | तपासणी सूची | अभिप्राय |
|---|---|---|
| १ | योजनेस प्रशासकीय मान्यता | शासन निर्णय, क्र.संकीर्ण-१११९/(२०/१५)LB/तांशि-२, दि.२३ मे, २०१८ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. |
| २ | निधी वितरण शासन निर्णयातील अटी व शर्तींची पूर्तता झाल्यानंतरच होणार आहे. | शासन निर्णयातील अटी व शर्तीनुसार निधी वितरीत करण्यात येत आहे. |
| ३ | यापूर्वी वितरीत केलेल्या निधीपैकी ७५% खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र | चालू वर्षी वितरीत केलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झालेले आहे. |

| | | |
|---|---|---|
| ४ | यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरिक्षक/महालेखापाल यांच्याकडून कोणतेही गंभीर आक्षेप नाहीत. | लेखा परिक्षकांकडून/महालेखापाल यांचे कोणतेही गंभीर आक्षेप नाहीत. |
| ५ | निधी लाभार्थ्यांच्या थेट खात्यात जमा होणार आहे. | वैयक्तिक लाभार्थी योजना नाही. |
| ६ | वस्तू खरेदी करण्यापूर्वी नियमित वापरात येणाऱ्या वस्तुंच्या बाबतीत त्याचे रितसर खरेदी नियोजन करावे व अकारण शिल्लक साठा असू नये. | सबंधित नाही. |
| ७ | यामधून खरेदी होणार असल्यास प्रत्यक्ष वस्तू प्राप्त झाल्यानंतरच सबंधितना देयक अदा केले जाणार आहे. | सबंधित नाही. |
| ८ | आवश्यक त्या ठिकाणी आदिवासी/सामाजिक न्याय विभाग यांची निधी वितरणास सहमती आहे. | सबंधित नाही. |
| ९ | प्रस्तुत योजनेत कोणतेही १ वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. | कोणतेही १ वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. |
| १० | निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च केला जाणार आहे. | सदरहू निधी संबंधित संस्थेच्या बांधकामावर खर्च केला जाणार आहे. |

४. यासाठी होणारा खर्च "मागणी क्र.डब्ल्यू-३, मुख्य लेखाशिर्ष २२०३- तंत्रशिक्षण -(००) (२४) - रसायन तंत्रज्ञान संस्था, माटुंगा, मुंबई (शासकीय अभिमत दर्जा विद्यापीठ) या संस्थेचे मुख्य केंद्र व त्याचे उपकेंद्र (कार्यक्रम), (२२०३ ३५६९), ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व तो सन २०२४-२५ करीता मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

५. सदर निधी वितरीत करण्यासाठी संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना नियंत्रण अधिकारी व लेखा अधिकारी, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना आंहरण व संवितरण अधिकारी घोषित करण्यात येत आहे.

६. सदर संस्थेस चालू वर्षी दिलेल्या व यापूर्वी दिलेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र संचालकांनी प्राप्त करुन घ्यावे व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

७. हे शासन ज्ञापन नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८१/२५/१४७१, दि.०७/०३/२०२५ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४४३/व्यय-५, दि.२६ मार्च,२०२५ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असुन त्याचा सांकेतांक २०२५०३२९१२५२१९८३०८ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANALI MILIND SAMANT

Digitally signed by MANALI MILIND SAMANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=a393e9553ec410a2133a89ca969ca76abd4ca892102ef711a7fff2d0c54599c7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C63B0A0419F0EB37099DACA08E4CCCCE3BF49154BF43E8881E68AC2CA3A46392, cn=MANALI MILIND SAMANT
Date: 2025.03.29 12:53:26 +05'30'

**( मनाली सामंत )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. कुलसचिव,रसायन तंत्रज्ञान संस्था, माटुंगा, मुंबई.(तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई.
४. महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई.
५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६. नियोजन विभाग /वित्त विभाग, मंत्रालय मुंबई.
७. अवर सचिव (तांशि-२/अर्थसंकल्प), उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती/तांशि-३.